**कृषि उन्नती योजना अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य योजनेंतर्गत ग्रामबिजोत्पादन योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्याकरिता निधी वितरीत करण्याबाबत (अनुसुचित जमाती प्रवर्ग)**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२३/ प्र.क्र.१९२/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०००३२

दिनांक : १४ मार्च, २०२४.

**संदर्भ** - : १. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. योजना ३३२२/प्र.क्र.१६५/१-से, दि.०१.११.२०२३ (प्रशासकीय मान्यता आदेश)

२. केंद्र शासनाचे पत्र क्र. १०-११/२०२०- SD-VI, दि.२२.१०.२०२३

३. कृषि आयुक्तालयाचे पत्र जाक्र. गुनि.१/२/पु.मा./एसव्हीएस २३-२४/२०२३/३४८२६, दि.३१/१०/२०२३

४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३.

५. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२३/प्र.क्र. ०७/कार्यासन-६, दि.१५.१२.२०२३.

६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. योजना ३३२३/प्र.क्र.१९२/१-अे, दि.१९.१२.२०२३.

७. केंद्र शासनाचे पत्र क्र. १०-११/२०२०- SD-VI, दि.३१.०१.२०२४.

८. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र. ५०/कार्यासन-६, दि.१३.०३.२०२४.

**<u>प्रस्तावना</u>:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी कृषि उन्नती योजने अंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी) ग्रामबिजोत्पादन योजनेच्या अंमलबजावणीसाठी अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्याच्या रु.५३२.२४ लाख व राज्य हिश्श्याच्या रु.३५४.८३ लाख अशा एकुण रु.८८७.०७ लाख इतक्या निधीच्या कृती आराखड्यास संदर्भ क्र.०१ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र.०२ वरील पत्रान्वये रु. १३३.०६ लाख इतका पहिला टप्प्याचा निधी वितरीत केलेला होता. केंद्र हिश्शाचा रु. १३३.०६ लाख व त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा रू. ८८.७० लाख इतका निधी कृषि आयुक्तालय, पुणे यांना संदर्भ क्र. ०६ वरील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.०७ वरील पत्रान्वये रु. १३३.०६ लाख इतका दुसऱ्या टप्प्याचा निधी वितरीत केलेला आहे. केंद्र हिश्शाचा रु. १३३.०६० लाख व त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा रू. ८८.७०७ लाख असा एकूण रु.२२१.७६७ लाख निधी वितरीत करण्यास आदिवासी विकास विभागाने मान्यता दिलेली आहे. सदर निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

कृषि उन्नती योजनेअंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एस.एम.एस.पी.) या केंद्र पुरस्कृत उपयोजनेंर्तगत ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम राज्यात <u>अनुसूचित जमाती</u> प्रवर्गाकरिता राबविण्यासाठी केंद्र हिश्शाचा रु. १३३.०६० लाख व त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा रू. ८८.७०७ लाख असा एकूण रु.२२१.७६७ लाख निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक- टी-५<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(०१)(२८) कृषी उन्नती योजना बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६० %)<br>२४०१ ए ६२८, (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य. | मागणी क्रमांक- टी-५<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(०१)(२९) कृषी उन्नती योजना बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(राज्य हिस्सा ४० %)<br>२४०१ ए ६३७, (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य. |

**३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे-**

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेकरिता प्राप्त झालेला निधी हा अनुसूचित जमाती संवर्गासाठी लाभार्थ्यांसाठी खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी, तसेच केंद्र हिश्श्यास अनुसरून समरूप राज्य हिस्सा खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र. ०८ येथील दिनांक १३.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील निर्देशांची पुर्तता करण्यात यावी.

७. वेळोवेळी शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी पीएफएमएस (PFMS) मधील SNA प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

४. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C.तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/तरतुदी नुसार, बजेट व कोषागार नियमावली नुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७७मधील भाग-पहिला, मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहे. तसेच आदिवासी विकास विभागाच्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१४१६४५०७७९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2024.03.14 16:54:43 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
३) मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
६) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
९) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११) सहाय्यक संचालक, लेखा-१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) अवर सचिव, कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.